राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत प्राप्त प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता देण्याबाबत (२०२१-२२)

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्र.औपासू- २०२२/ प्र.क्र.७०/ उद्योग-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २३ मे, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दिनांक २२/०२/२०१३.

२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४.

३) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/प्र.क्र.२१९/उद्योग-२, दिनांक २०/१२/२०१६.

४) सुकाणू समितीच्या आठव्या बैठकीचे इतिवृत्त दिनांक २४/०२/२०२२

५) उद्योग उप संचालक (साप्रयो), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ पायाभूत सुविधा/८ वी बैठक/प्रशासकीय मान्यता/२०२२/ अे-२५८, दिनांक ०७/०३/२०२२

६) उद्योग उप संचालक (साप्रयो), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ औपासु/ नागपूर अगरबत्ती /सन २१-२२/२२/ अे-१५३, दिनांक ०९/०३/२०२२

७) शासन निर्णय क्र. औपासू-२०२२/प्र.क्र.४६/उद्योग-२,दिनांक २९/०३/२०२२

८) उद्योग उप संचालक (साप्रयो), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ औपासु/ २०२२/ अे-६३६, दिनांक ०५/०५/२०२२

**शासन निर्णय**

महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत प्राप्त झालेल्या प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समितीची ८ वी बैठक दिनांक २४/०२/२०२२ रोजी संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये समितीने नागपूर अगरबत्ती क्लस्टर असोसिएशन, मऔविम,उमरेड, जि. नागपूर या संस्थेस खालील नमूद पायाभूत सुविधांच्या कामांकरीता निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर कामांकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ ही कार्यान्वयन यंत्रणा आहे.

| अ. क्र | औद्योगिक वसाहत/ समुह | पायाभूत सुविधा तपशील व कार्यान्वयन यंत्रणा | कार्यान्वयन यंत्रणाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेची रक्कम (रुपये) | सुकाणू समितीने मान्यता दिल्यानुसार पायाभूत निधीतून द्यावयाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | नागपूर अगरबत्ती क्लस्टर असोसिएशन, मऔविम, उमरेड,जि. नागपूर | 1)Construction of WBM rd – Rs. 51,63,540<br>2) DI K-7 pipeline - Rs. 8,58,048<br>3) roads considering 50mm BM & 25 mm BC- Rs 10,33,200<br>4) Tree Plantation including Maintanance Rs 52,750<br>5) Construction of RCC Gutter of both side of rd – Rs 71,21,208<br>6) power supply & street light- Rs 39,94,748.39<br>**Total –Rs 18223494.39**<br>7) 12% GST – Rs21,86,819.327<br>8) 5% contingencies – Rs 1020515.686<br>9) 5% Escalation- Rs 1020515.686<br>**Total – Rs 22451350**<br>10)**5% ETP Charges – Rs 1122567**<br>**Total – Rs 2,35,74,000/**<br>**कार्यान्वयन यंत्रणा : -(MIDC)** | २,३५,७४,००० | १,७६,८०,५००<br>(७५ टक्के) |

२. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने संस्थेच्या कामांकरीता एकूण रुपये २,३५,७४,०००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर संस्थेच्या प्रकल्पाचे नकाशे व अंदाजपत्रकाची महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने तपासणी केली असून, त्यास तांत्रिक मान्यता दिली आहे. नागपूर अगरबत्ती क्लस्टर असोसिएशन, मऔविम,उमरेड,जि.नागपूर यांनी त्यांच्या हिस्स्याची २५ टक्के रक्कम कार्यान्वयन यंत्रणेकडे जमा करण्याबाबतचे प्रतिज्ञापत्र, देखभाल दुरुस्तीबाबतचे हमीपत्र तसेच रस्ता सामान्य जनतेसाठी खुला करण्यात येईल याबाबतच्या हमीपत्राचा करारनामा देखील उद्योग संचालनालयाशी दिनांक २३/०२/२०२२ रोजी केला आहे. या सर्व बाबी विचारात घेता, संस्थेच्या कामांकरीता एकूण रुपये २,३५,७४,०००/- (रुपये दोन कोटी पस्तीस लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चाचे नकाशे व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रकल्प किंमतीमध्ये झालेली वाढ संस्थेस अनुज्ञेय राहणार नाही. वाढीव खर्च संस्थेमार्फत करण्यात यावा.

४. सदर प्रशासकीय मान्यता ही सुकाणू समितीच्या दिनांक २४/०२/२०२२ रोजी झालेली आठव्या बैठकीमध्ये समितीने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/ प्र.क्र.२३४/ उद्योग-२, दि.२५/०२/२०१४ मधील परि. ६ नुसार देण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२२०५१३१८१००६९०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.06.03 17:02:30 +05'30'

**(संजय देगांवकर)**
**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) नागपूर अगरबत्ती क्लस्टर असोसिएशन,मऔविम,उमरेड, जि. नागपूर
९) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१०) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
११) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (उद्योग-२)